**कृषि व पणन विभागाच्या अखत्यारीतील महामंडळांच्या कामकाजात सुसूत्रता आणण्याकरिता उच्चाधिकार समिती स्थापन करणेबाबत...**

**महाराष्ट्र शासन**
कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
शासन निर्णय क्र.समिती-२०११/प्र.क्र.१२५/६-अे
दिनांक : - १८ जुलै २०११

संदर्भ :- १) मा.मंत्री (कृषि) यांचे क्र.मंत्री/कृषि व पणन/जनरल/११६/२०११, दि.३.३.२०११ चे पत्र.

**प्रस्तावना :-**

राज्यातील शेतकऱ्यांच्या विकासाकरिता कृषि विभागामार्फत विविध योजना राबविल्या जातात. पणन विभागामार्फत शेतमालाची प्रक्रीया व त्याच्या विपणनासंबंधिच्या योजना राबविल्या जातात. शेतीच्या विकासासाठी व शेतकऱ्यांच्या विकासाकरिता कृषि व पणन विभागाच्या विविध योजना या महामंडळांकडूनही राबविल्या जातात. महामंडळांकडून प्रामुख्याने निविष्ठा पुरवठा, मालावरील प्रक्रीया, मालाची साठवणूक इ.विषयक कामकाज केले जाते.

राज्यातील कृषि व पणन विभागाच्या अखत्यारीतील महामंडळाच्या कामकाजात सुसूत्रता आणण्याकरिता उच्चाधिकार समिती स्थापन करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

राज्यातील कृषि व पणन विभागाच्या कामकाजात सुसूत्रता आणणे, अधिक प्रभावीपणे योजनांचा लाभ शेतकऱ्यांना देण्याकरिता मा.मंत्री (कृषि) यांच्या अध्यक्षतेखालील उच्चाधिकार समितीची स्थापना करण्यात येत आहे. सदर समितीची रचना खालीलप्रमाणे असेल :-

| | | |
|---|---|---|
| १) मा.मंत्री (कृषि) | - | अध्यक्ष |
| २) प्रधान सचिव, कृषि व पणन | - | सदस्य |
| ३) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य बियाणे महामंडळ मर्या. | - | सदस्य |
| ४) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र कृषि उद्योग विकास महामंडळ मर्या. | - | सदस्य |
| ५) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य कृषि पणन मंडळ | - | सदस्य |
| ६) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य सहकारी पणन महासंघ | - | सदस्य |
| ७) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य ग्राहक महासंघ | - | सदस्य |
| ८) अध्यक्ष, महाराष्ट्र राज्य वखार महामंडळ | - | सदस्य |
| ९) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य वखार महामंडळ | - | सदस्य |
| १०) अध्यक्ष, कुलगुरु समन्वय समिती | - | सदस्य |
| ११) प्रकल्प संचालक, महाराष्ट्र स्पर्धाक्षम कृषि विकास प्रकल्प | - | सदस्य |
| १२) संचालक, पणन | - | सदस्य |
| १३) प्रकल्प संचालक, इंटरनॅशनल फंड ऑफ ॲग्रीकल्चर डेव्हलपमेंट | - | सदस्य |
| १४) प्रकल्प संचालक, एशियन डेव्हलपमेंट बॅंक प्रकल्प | - | सदस्य |
| १५) आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, पुणे | - | सदस्य सचिव |

२. समितीची कार्यकक्षा पुढिलप्रमाणे राहिल- कृषि व पणन विभागांर्तगत असलेल्या महामंडळाच्या कामात सुसुत्रता आणुन शेतक-यांना योजनांचा जास्तीत जास्त लाभ मिळाणे आवश्यक आहे.याकरीता शासन स्तरावर या सर्व महामंडळांना मार्गदर्शन / सुचना / निदेश / आदेश देवु शकेल अशी उच्चाधिकार समिती वरील प्रमाणे असुन सदर उच्चाधिकार समितीस कृषि व पणन विभागाच्या अखत्यारितील महामंडळांस त्यांचे कामकाज कोणत्या प्रकारे करावे याबाबत मार्गदर्शन / सुचना / निदेश / आदेश देण्याचे अधिकार असतील. व सदर / सुचना / निदेश / आदेश हे संबधित महामंडळे,कृषि व पणन विभाग यांचेवर बंधनकारक राहतील.

३. समितीच्या सदस्य सचिवांनी सदर समितीच्या बैठकांचे आयोजन तसेच बैठकीबाबतची सुचना व तद्नुषंगिक कामकाज याचे समन्वय करावे.

सदर शासन निर्णय शासनाच्या www.maharashtragov.in या वेबसाईटवर उपलब्ध असुन त्याचा संगणक सांकेतांक २०११०७२०११५५०७००१ हा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

(दि.भि. कुदळे )
उप सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत -

मा.राज्यपाल यांचे सचिव राज्यपालांचे कार्यालय, मलबार हिल, मुंबई.
मा.मंत्री (कृषि व पणन) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
मा.राज्यमंत्री (कृषि ) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
मा.राज्यमंत्री (पणन) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट राज्य बियाणे महामंडळ मर्या., अकोला
व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र कृषि उद्योग विकास महामंडळ मर्या., मुंबई
व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य कृषि पणन मंडळ, पुणे
व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य सहकारी पणन महासंघ,
व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य ग्राहक महासंघ, मुंबई
अध्यक्ष, महाराष्ट्र राज्य वखार महामंडळ , मुंबई
अध्यक्ष, कुलगुरु समन्वय समिती.
व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य वखार महामंडळ, मुंबई
प्रकल्प संचालक, महाराष्ट्र स्पर्धाक्षम कृषि विकास प्रकल्प
संचालक, पणन
प्रकल्प संचालक, इंटरनॅशनल फंड ऑफ ॲग्रीकल्चर डेव्हलपमेंट
प्रकल्प संचालक, एशियन डेव्हलपमेंट बॅक
महासंचालक, महाराष्ट्र कृषि शिक्षण व संशोधन परिषद, भांबुर्डा, भोसले नगर, पुणे -४११०००७
कृषि व पदुम विभागातील सह सचिव, उप सचिव, अवर सचिव, मंत्रालय, मुंबई
प्रधान सचिव (कृषि) यांचे स्वीय्य सहायक, मंत्रालय, मुंबई
कार्यासन-७अे/८अे, कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई
निवड नस्ती